राज्यातील प्रमुख पिकांवरील कीड व रोगांच्या व्यवस्थापनाच्या दृष्टीने कीड-रोग सर्वेक्षण व सल्ला योजने (क्रॉपसॅप) अंतर्गत सन २०२१-२२ मधील प्रलंबित देयकांसाठी रु.५.२५ कोटी इतका निधी वितरीत करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- किरोनी-२०२३/प्र.क्र.४०/११-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ३१ मार्च, २०२३

वाचा :-

१)कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.किरोनी/२०२०/प्र.क्र.५६/११-अे, दि.३१.०५.२०२१
२)शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२ /प्र.क्र.४३ /अर्थ-३, दि.४.०४.२०२२.
३)वित्त विभाग अ. शा. पत्र क्र.अर्थसं-२०२२ /प्र.क्र.४३ /अर्थ-३,दि.५.०४.२०२२.
४)कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.किरोनि/२०२२/प्र.क्र.६५/११-अे, दि.१०.०६.२०२२
५)कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.किरोनि/२०२२/प्र.क्र.६५/११-अे, दि.१४.०६.२०२२
६) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.किरोनि/२०२२/प्र.क्र.६५/११-अे, दि.१२.१०.२०२२
७) संचालक (वि. व प्र.), कृषि आयुक्तालय पुणे यांचे पत्र जा. क्र./विप्र-७/क्रॉपसॅप २२-२३/ प्र.दायित्व-२१-२२/३८२१९/२०२३, दि.१५.११.२०२२
८)कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.किरोनि/२०२२/प्र.क्र.६५/११-अे, दि.१६.०१.२०२३
९)संचालक (वि. व प्र.), कृषि आयुक्तालय पुणे यांचे पत्र जा. क्र./विप्र-७/क्रॉपसॅप २२-२३/ प्र.दायित्व-२१-२२/७१७०/२०२३, दि.२४.०२.२०२३

प्रस्तावना:-

प्रमुख पिकांवरील कीड व रोगाच्या व्यवस्थापनाच्या दृष्टीने पिकांवरील कीड-रोग सर्वेक्षण व सल्ला (क्रॉपसॅप) योजना राबविण्यासाठी सन २०२२-२३ मध्ये रु. २५ कोटी निधीच्या कार्यक्रमास संदर्भ क्र. (४) अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. प्रस्तुत योजनेसाठी संदर्भ क्र. (५) अन्वये रु. ५.२५ कोटी, संदर्भ क्र. (६) अन्वये रु. १.७५ कोटी व संदर्भ क्र. (८) अन्वये रु. ५.२५ कोटी असे एकूण रु.१२.२५ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला असून, आयुक्त कार्यालयाने संदर्भ क्रं. (७) व (९) च्या पत्रान्वये विनंती केल्यानुसार क्रॉपसॅप सन २०२१-२२ व हॉर्टसॅप सन २०२१-२२ या योजनांतर्गत सन २०२१-२२ मधील प्रलंबित देयकांसाठी रु.५.२५ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

सोयाबीन, कापूस, भात, तूर, हरभरा, मका, ज्वारी व ऊस तसेच फळपिके आंबा, डाळींब, केळी, मोसंबी, संत्रा, चिक्कू, काजू, भेंडी व टोमॅटो या प्रमुख पिकांवरील कीड व रोगाच्या व्यवस्थापनाच्या दृष्टीने राबविण्यात येणाऱ्या पिकांवरील कीड-रोग सर्वेक्षण व सल्ला (क्रॉपसॅप) योजनेअंतर्गत सन

२०२१-२२ मधील प्रलंबित देयकांसाठी (मोबाईल इंटरनेट ही बाब वगळता इतर बाबींसाठी) रु.५.२५ कोटी इतका निधी संदर्भ क्र.(७) अन्वये केलेल्या विनंतीस अनुसरुन सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या मंजूर निधीतून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. क्रॉपसॅप योजनेअंतर्गत सन २०२१-२२ मधील प्रलंबित देयकांसाठीचा खर्च पुढील लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ करीता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा:-

**मागणी क्र. डी-३**
**२४०१,पीक संवर्धन,**
**१०२-अन्नधान्यपीके, (००) (३०) पिकावरील कीड-रोग सवक्षेण व सल्ला प्रकल्प**
**(२४०१ ९२४२) राज्य योजना, ३३-अर्थसहाय्य**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी शासन निर्णय दि.३१.०५.२०२१ मधील तरतूदींच्या तसेच वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचनांच्या अधिन राहुन खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ, आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून व आयुक्तालय स्तरावरील खर्चासाठी सहाय्यक संचालक, लेखा-१, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, विभागीय कृषि सहसंचालक स्तरावर विभागीय कृषि सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी, जिल्हा स्तरावर जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, उपविभाग स्तरावर उपविभागीय कृषि अधिकारी व तालुका स्तरावर तालुका कृषि अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे अनौसं. क्रमांक १७९/का.१४३१, दि.२४.०३.२०२३ व अनौसं.संदर्भ क्रमांक १०५/२०२३/व्यय-१, दि.२८.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३११२१५५९६९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SARITA RISHI
BANDEKAR DESHMUKH

Digitally signed by SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E40A063B6B4E8F59F91F350AA6FEC292A55DB5BF8829C64D6C44E00A701CDAAC, cn=SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
Date: 2023.03.31 12:20:59 +05'30'

**( सरिता बांदेकर- देशमुख )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. विधानसभा/ विधानिपरषद सदस्य,विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

६. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
९. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१०. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, साखर संकुल,शिवाजीनगर,पुणे.
११. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१२. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
१३. महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा), मुंबई.
१४. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१७. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय,पुणे
१८. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - ३), मंत्रालय, मुंबई
१९. निवड नस्ती ११-अे.